राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१५/प्र.क्र.११/आरोग्य-५,**

जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग, १० वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २१ फेब्रुवारी, २०१५

संदर्भ :-

१) केंद्रीय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. जी. २५०१२/२००९/एनआरएचएम फायनान्स, दि. १० फेब्रुवारी, २०१४ चे पत्र.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०१४/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प, दि.२७ जून, २०१४.
३) सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे क्र.संआसे/अंनिका/कक्ष८अ/ टे.४/प्रशासकिय मान्यता/२६१-६६/१५, दि.१३.०१.२०१५ चे पत्र.

प्रस्तावना :

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना सन १९७६ सालापासून सुरु करण्यात आली आहे. या योजनेसाठी केंद्र शासनाकडून १००% अनुदान देण्यात येत होते. सन २०१३-१४ पासून या योजनेस ७५% केंद्र शासन व २५% राज्य शासन याप्रमाणे अनुदान देण्यात येत आहे.

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांची उद्दिष्ट्ये व कार्ये पुढील प्रमाणे :

*कार्यक्रमाची ठळक उद्दीष्टे :-*

१) डोळ्यांबाबतच्या उच्च दर्जाच्या सेवा लोकांना देणे
२) दुर्गम व ग्रामीण भागात सेवा नाहीत अशा भागात सेवा पोहचविणे
३) अनुशेष भरुन काढण्यासाठी जास्तीच्या सेवा देणे
४) आरोग्य संस्थांना साधनसामुग्री व तज्ञ व्यक्तीची नेमणूक करुन रुग्णांना सेवा देणे.
५) कार्यक्रमात अशासकीय स्वयंसेवी संस्थांना व खाजगी डॉक्टरांना समाविष्ट करुन डोळ्यांच्या आजारावरील सेवा पुरविणे.
६) सामान्य जनमाणसात डोळ्यांचे विविध आजार व त्यावरील उपचारांबाबत आरोग्य शिक्षण देवुन जनजागृती करणे.

*कार्यक्रमाची कार्यप्रणाली :-*

१) जिल्हास्तरावर अधिकार देऊन जिल्हा अंधत्व नियंत्रण सोसायटीमार्फत कार्यक्रम राबविणे.
२) ५० वर्षे वयावरील सर्वांची तपासणी शिबीरे आयोजित करुन व वाहतूक सेवा देऊन जास्तीत जास्त अंधत्वाचे प्रमाण कमी करणे.

३) स्वयंसेवी संस्थांचा व खाजगी डॉक्टरांचा सहभाग घेऊन डोळयांचे आजारांचे निराकरण करणे.
४) ग्रामीण भागात स्थानिक लोकनियुक्त संस्थांचा व जनतेचा सहभाग घेऊन सेवा देणे.
५) तज्ञ व्यक्तींना प्रशिक्षण देऊन व साहित्य सामुग्री पुरवठा करुन कार्यक्रमास सुधारणा करणे.
६) शालेय विद्यार्थ्यांची तपासणी करुन दृष्टीदोष शोधणे व त्यांचेवर उपचार करणे.
७) सन २०१४-१५ पासून ४५+ वर्ष वयोगटातील व्यक्तींची डोळयांची तपासणी करुन गरजू व गरीब व्यक्तींना मोफत चष्मे पुरविणे.
८) ग्रामीण भागातील अशिक्षित महिलांसाठी योजना राबविणे, यामध्ये स्त्रीयांसाठी व मुलांसाठी राबविणाऱ्या वेगवेगळया योजनांच्या संस्थेचा सहभाग घेणे.
९) शासकीय व स्वयंसेवी संस्थांमार्फत मोतिबिंदू शस्त्रक्रिया, काचबिंदू व इतर नेत्र आजारांबाबत मोफत सेवा पुरविणे.
१०) शालेय विद्यार्थ्यांचे नेत्रतपासणी करुन दृष्टीदोष आढळून आलेल्या विद्यार्थ्यांना चष्मे पुरवठा करणे.

***अकराव्या योजनेचे उद्दीष्ट :-***

१) मृत्यु पश्चात दान केलेल्या बुब्बुळ जमा करुन नेत्र प्रत्यारोपण करणे.
२) सार्वजनिक क्षेत्रातील नेत्र रुग्णालयामार्फत अधिकाधिक क्षमतेने सेवा पुरविणेकरीता विविध स्तरावरुन मार्गदर्शन व अर्थसहाय्य पुरविणे.
३) ग्रामीण भागातील अशासकीय स्वयंसेवी संस्थांना अनावर्ती अनुदान देऊन बळकटीकरण व विस्तारित करणे.
४) जिल्हा रुग्णालयात नेत्ररुग्ण कक्ष व नेत्र शस्त्रक्रियागृहाची बांधणी करणे.
५) नेत्र तज्ञांना अद्यावत तांत्रिक शिक्षण देणे.
६) विविध आरोग्य संस्थांना पुरविण्यात आलेल्या यंत्र सामुग्रीचे वार्षिक देखभाल दुरुस्ती करणे.

मागील वित्तीय वर्षापर्यंत (२०१३-१४) या योजनेसाठी उपलब्ध होणारी केंद्र हिश्याची रक्कम थेट राज्य आरोग्य सोसायटीच्या बँक खाती जमा होत होती. सन २०१४-१५ या वितीय वर्षापासून केंद्र शासनाने या धोरणात बदल करुन या योजनेसाठी केंद्र शासनाकडून दिला जाणारा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे कोषागारामार्फत राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याच्या सूचना वरील संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये दिल्या आहेत. त्यानुसार या कार्यक्रमास राज्याच्या एकत्रित निधीद्वारे निधी वितरणासाठी नवीन लेखाशिर्षे घेण्यात आली आहेत. तसेच सदर लेखाशिर्षांतर्गत निधीची तरतूद देखिल करण्यात आली आहे. राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमास सन २०१३-१४ पर्यंत केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी परस्पर अंमलबजावणी अधिकाऱ्यांना प्राप्त होत असल्याने या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी प्रशासकीय मान्यता घेण्यात आली नव्हती. मात्र चालू वित्तीय वर्षापासून या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाकडून व राज्य शासनाकडून देण्यात येणारा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे उपलब्ध करुन द्यावयाचा असल्याने राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार, राज्यात राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम या योजनेची अंमलबजावणी करण्यास तसेच सन २०१४-१५ करिता रु.२०.०० कोटी इतक्या प्रकल्प आराखडयास (२५ टक्के राज्य हिस्सा) प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर कार्यक्रम २०१२-२०१७ या पंचवार्षिक योजनेमध्ये दि.३१.०३.२०१७ पर्यंत कार्यान्वित राहील. सदर कार्यक्रमाकरीता सन २०१४-१५ करिता केंद्र शासनाचा ७५ टक्के हिस्सा प्रमाणे रु.२४,९५,००,०००/- इतका निधी अर्थसकल्पित करण्यात आला असून राज्य हिस्सा २५ टक्के प्रमाणे रु. २,१३,०१,०००/-इतक्या निधीची पुरवणी मागणीद्वारे तरतूद करण्यात आली आहे. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाच्या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमाचा समावेश करण्यात आला असून या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य हिस्सा निधीचे प्रमाण ७५:२५ असे राहणार आहे.

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीपैकी अनुसुचित जातीच्या लाभार्थ्यांसाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत, तसेच अनुसुचित जमातीच्या लाभार्थ्यांसाठी आदिवासी विकास विभागामार्फत लेखाशीर्षनिहाय निधी अर्थसंकल्पित करुन, त्यानंतर निधीचे वितरण करण्यात येईल.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१/२०१५/अर्थ-९,दि.०९.०२.२०१५ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२१११५४११९७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2015.02.25 15:07:19 +05'30'

**(ज्ञा. ल. सुळ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) , मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (नियोजन विभाग) , मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

४) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई
७) सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), आरोग्य भवन, मुंबई.
८) सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य भवन, मुंबई.
९) उप संचालक, आरोग्य मंडळ (सर्व)
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१३) वैद्यकिय आरोग्य अधिकारी (सर्व महानगरपालिका)
१४) जिल्हा आरोग्य अधिकारी, जि.प. (सर्व)
१५) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६) मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७) मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१८) अवर सचिव (अर्थ.), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) अवर सचिव (लेखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) अवर सचिव (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती (आरोग्य-५), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई